**बावनथडी प्रकल्पातून सोरणा मध्यम प्रकल्पात पाणी सोडण्याकरीता बावनथडी प्रकल्पाच्या उजवा कालव्याच्या १६५०० मी. वरून पूरक कालव्याचे विस्तार व सुधारणा अंतर्गत बांधकामासाठी प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता.**

# महाराष्ट्र शासन

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : प्रमाप्र-२०२०/प्र.क्र.१३२/२०२०/सिंव्य (कामे)**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२

दिनांक : ३०/०३/२०२२

__वाचा__ :- १) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचे पत्र क्र.२४४७३/विपाविम/कातां-६(१)/सोरणा म.प्र./प्रथम सुप्रमा प्रस्ताव २०२०, दि.२१/०५/२०२०

२) शासन परिपत्रक क्र. प्रमा-२०१३/(७८५/१३)/सिंव्य(कामे) दि १/१/२०१५.

३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/विनियम भाग-२, दि.१७/०४/२०१५

४) जलसंपदा विभाग, शासन निर्णय, क्र.: संकीर्ण-२०१५/प्र.क्र.४२५/१५/मप्र,दि.१६.११.२०१६

५) जलसंपदा विभाग ,शासन निर्णय, संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२७/१६/लपा-०२,दि.२६.०५.२०१७

६) जलसंपदा विभाग,शासन निर्णय,क्र.प्रमाप्र-२०१७/प्र.क्र.३६/१७/सिंव्य कामे,दि.०३.०८.२०१७

७) जलसंपदा विभाग,शासन निर्णय ,क्र.२०१७/५६६/१७/सिंव्य कामे,दि.३१.०८.२०१८

८) जलसंपदा विभाग,शासन निर्णय संकीर्ण- २०१८/प्र.क्र.५५१/१७/सिंव्य कामे,दि.२७.११.२०१८

९) शासन निर्णय,क्र.प्रमा-२०१३/(७८५/१३)/सिंव्य कामे,दि.०१.०८.२०१९

१०) वित्त विभाग,शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३,दि.०४.०५.२०२०

__प्रस्तावना__ :-

मोहाडी तालुक्यातील सोरणा मध्यम प्रकल्पाचे बांधकाम सन १९७१ मध्ये पूर्ण होऊन सदर प्रकल्प सिंचन व्यवस्थापन व देखभाल दुरूस्तीकरीता हस्तांतरीत झालेला आहे. सदर प्रकल्प गोदावरी खोरे अंतर्गत पैनगंगा उपखोऱ्यात आहे. हा प्रकल्प सोरणा गावाजवळील स्थानिक नाल्यावर बांधण्यात आलेला आहे. सदर प्रकल्पाच्या माती धरणाची महत्तम उंची १४.३३ मीटर आहे. तसेच प्रकल्पास मुक्त प्रवाही बांधकामातील १०६.६८ मीटर लांबीचा सांडवा आहे. सोरणा धरणाचा एकूण साठा ६.१७२ दलघमी असून उपयुक्त साठा ५.७३३ दलघमी आहे. सिंचनाकरीता डावा कालवा ६.३० किमी व उजवा कालवा ६.७७ किमी आहे. या प्रकल्पाचे शेती योग्य क्षेत्र ( C.C.A.) १५५३ हे. व सिंचन योग्य क्षेत्र (ICA) ९३३ हे. असून १०९१ हे. करारनामा क्षेत्र आहे.

मागील १३ वर्षातील जलसाठ्याच्या आकडेवारी वरून असे निदर्शनास येते की, सोरणा प्रकल्प फक्त ७५% भरतो. प्रकल्प पूर्ण भरल्यास खरीप हंगामात १०९१ हे. क्षेत्राला सिंचन होते. सोरणा प्रकल्पाच्या लाभक्षेत्रातील लाभधारकांना खरीप पिकानंतर रब्बी /उन्हाळी पिके घेण्याकडे कल आहे.

बावनथडी प्रकल्पाचे नियोजित लाभक्षेत्रात शहरीकरण व औष्णिक वीज प्रकल्पामुळे ७८५ हे. सिंचन क्षेत्रात घट होते. त्यामुळे बावनथडी प्रकल्पाच्या नियोजित पाणी वापरामध्ये २.२१ दलघमी बचत होते. या पाणी बचतीमधून सोरणा मध्यम प्रकल्पास पाणी देणे शक्य असून या पाणी उपलब्धतेमुळे सोरणा प्रकल्पाचे १३११ हे. सिंचित क्षेत्र जास्त रब्बी/उन्हाळी सिंचनाखाली येईल व त्यामुळे लाभधारकांच्या आर्थिक परिस्थितीत सुधारणा होईल. याकरीता बावनथडी मध्यम प्रकल्पातून पूरक/भरण कालव्याद्वारे पाणी सोरणा मध्यम प्रकल्पात सोडण्याचा प्रस्ताव तयार करण्यात आला होता.

सदरचे उद्दिष्ट साध्य होण्याच्या दृष्टीने शासनाने सोरणा मध्यम प्रकल्पाकरीताच्या पूरक कालव्याचे विस्तार व सुधारणा अंतर्गत बांधकामास शासन निर्णय क्र.प्रमाप्र-२०१७/प्र.क्र.३६ / २०१७/

सिंव्य (कामे), दि.०३/०८/२०१७ नुसार रू.१६३.३६ लक्ष (दरसूची सन २०१६-१७) इतक्या किंमतीस प्रशासकीय मान्यता मिळाली आहे.

अप्पर प्रधान मुख्य संरक्षक, महाराष्ट्र राज्य नागपूर यांचे दि.११.०५.२०१८ चे पत्रानुसार वनजमिन भुसंपदानासाठी पुरक कालव्याकरीता लागणाऱ्या व वनजमिनीमध्ये असणाऱ्या नाल्याचे क्षेत्राचा अंतर्भाव करण्याचे कळविले. त्यानुसार पुरक कालवा २.५७४ हे. व नाल्याचे क्षेत्र ३.९६७ हे. असे एकूण ६.५३७ हे. वनजमिनीचा अंर्तभाव करण्यात आला व सुधारित वन भुसंपदादनाचा प्रस्ताव वन विभागास सादर करण्यात आला. सोरणा मध्यम प्रकल्पाकरीताच्या ६.५३७ हे. क्षेत्राच्या वन भुसंपदानाच्या प्रस्तावास भारत सरकार पर्यावरण, वन तथा जलवायु मंत्रालय यांचे दि.१०.१०.२०१८ अन्वये अंतिम मान्यता दिलेली आहे. वनजमिनी भुसंपादन क्षेत्रामध्ये झालेल्या वाढीमुळे वन जमिनीच्या भुसंपादनाकरीता लागणारा अतिरिक्त निधी रू.१४२.९२ लक्ष वन विभागाकडे दि.१०.०१.२०१९ रोजी देण्यात आलेला आहे.

प्रशासकीय मान्यता प्राप्त रक्कम रू.१६३.३६ लक्ष चे प्रस्तावातील कामाकरीता असलेली रक्कम रू.१४८.५१ लक्ष पैकी रू.१४२.९२ वनजमिनीचे भुसंपादनाकरीता खर्च करण्यात आल्यामुळे आता बांधकामाकरीता रू.५.५९ लक्ष फक्त शिल्लक आहेत. शिल्लक आहेत. शिल्लक रक्कमेत पुरक कालव्यचे बांधकाम पूर्ण होऊ शकत नाही.

भूसंपादनाचे किंमतीत वाढ झाल्यामुळे व सदर कामाच्या स्थापत्य भागाकरीता करारनामा झालेला असल्यामुळे मूळ अंदाजपत्रकात बदल न करता फक्त भुसंपादनाची अतिरिक्त तरतूद वाढवून कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांनी दि.२१.०५.२०२० च्या पत्रान्वये बावनथडी प्रकल्पातून सोरणा मध्यम प्रकल्पात पाणी सोडण्याकरीता बावनथडी प्रकल्पाच्या उजव्या कालव्याच्या १६५०० मी. वरुन पूरक कालव्याचे विस्तार व सुधारणा अंतर्गत बांधकामासाठीचा प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता मिळणेबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे.

या अनुषंगाने सोरणा पूरक कालव्याचे बांधकामास विस्तार व सुधारणा अंतर्गत प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्याप्रमाणे शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ,नागपूर अंतर्गत सोरणा मध्यम प्रकल्पांतर्गत सोरणा ता.मोहाडी,जि.भंडारा या पूरक कालव्याचे विस्तार व सुधारणा योजनेअंतर्गत बांधकामासाठी रु.२,७९,५४,७०१/- (रु.दोन कोटी एकोणऐंशी लक्ष चौपन्न हजार सातशे एक फक्त) एवढया खर्चाच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून सोबतच्या प्रपत्रानुसार प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

१) तांत्रिक मान्यता ,निविदा प्रक्रिया, कामाचे नियोजन व पूर्णत्व, प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेत खर्च करणे इ. बाबींसाठी प्रचलित शासन निर्णय /परिपत्रके यांचे पालन करणे बंधनकारक राहिल.

२) प्रस्तावित कामांमुळे होणाऱ्या खोदकाम तोडफोड याव्दारे उपलब्ध होणारे बांधकाम साहित्याचा पूर्ण वापर करुन बचत साधावी.

३) सदर अंदाजपत्रकातील कामांसाठी कोणत्याही प्रयोजनार्थ सर्वसाधारणपणे मंजूर सुधारीत प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन,निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च करता येणार नाही.

४) सदर दुरुस्ती काम पूर्ण झाल्यानंतर प्रकल्पाच्या लाभक्षेत्रांतर्गत पाणी वापर संस्था स्थापित करुन लाभक्षेत्र हस्तांतरीत करणेची संपूर्ण जबाबदारी क्षेत्रीय अधिका-याची राहील.

५) जलसंपदा विभाग,शा.नि.दि.२७.११.२०१८ नुसार विषयांकित प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता प्राप्त कामास महामंडळाच्या पुढील नियामक मंडळ बैठकीत मान्यता घ्यावी. त्यानंतरच पुढील कार्यवाही करता येईल.

६) विषयांकित सुधारीत प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी अथवा निविदा विषयक क्षेत्रिय स्तरावरील निर्णयास मान्यता गृहीत धरली जाणार नाही.

प्रस्तावित कामासाठी होणारा " ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च (११) विविध पाटबंधारे महामंडळांना भाग भागभांडवली अंशदान (विस्तार व सुधारणा) (०१) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (कार्यक्रम) (४७०१ जे-१५८ ) ५४, गुंतवणुका या लेखाशीर्षाखाली करावा व मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदरचा शासन निर्णय आंतरवित्तीय सल्लागार व सहसचिव यांच्या सहमतीने व नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२११/२०२१/१४३४,दि.०९.११.२०२१ व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.४४९/ २०२१/व्यय-१२ दि.२०.१२.२०२१ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

या कामास प्रदान करण्यात आलेली प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता सिं.व्य (कामे) कार्यासनाच्या नोंदवही सन २०२१-२२ मध्ये अ.क्र.५८ वर नोंदविण्यात आलेली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३३०१५२२२०७५२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vaijnath Manmathappa Chille

Digitally signed by Vaijnath Manmathappa Chille
DN: CN = Vaijnath Manmathappa Chille, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Water Resources Department
Date: 2022.03.30 15:23:49 +05'30'

**( वैजनाथ चिल्ले )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत:-**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
४. मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष,विधानसभा,विधानभवन,मुंबई,
५. मा.सभापती/उपसभापती,विधानपरिषद, विधानभवन,मुंबई,
६. मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई,
७. मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन,मुंबई,
८. मा.मंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
९. मा.राज्यमंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई,
१०. अपर मुख्य सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
११. अ.मु.स.(नियोजन ) यांचे स्वीय सहायक,नियोजन विभाग,मंत्रालय,मुंबई
१२. अ.मु.स.(वित्त) यांचे स्वीय सहायक,वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
१३. सचिव (जसंव्य व लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१४. सचिव (प्रकल्प समन्वय) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय,मुंबई,

१५. महालेखापाल-१ (लेखा व अनूज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१६. महालेखापाल-२ (लेखा व अनूज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य,नागपूर,
१७. कार्यकारी संचालक, विदर्भ  पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर,
१८.मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, उत्तर महाराष्ट्र प्रदेश ,नाशिक
१९.आंतरवित्त सल्लागार व सहसचिव, जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
१८. अधिक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण,नागपूर,
१९.  कार्यकारी अभियंता,वाघ इंटियाडोह पाटबंधारे विभाग, गोंदिया
२०.  सिं.व्य.(कामे) कार्यासन संग्रहार्थ.

शासन निर्णय क्रमांक: प्रमाप्र-२०२०/ (प्र.क्र.१३२/२०२०)/ सिं.व्य.(कामे)
दिनांक : ३०/०३/२०२२ चे सहपत्र

| Sr No | Description of Item | Amount of revised A.A.(Rs.) |
|---|---|---|
| 1 | "A" Preliminary | 1045 |
| 2 | "B" Land | 1,42,91,695 |
| 3 | F-C.D.Works | 82,91,108 |
| 4 | L- Earthen work | 39,95,625 |
| 5 | Royalty | 1,04,791 |
| 6 | 1% insurance | 95,633 |
| 7 | 3% contegencies | 3,68,634 |
| 8 | 12% GST | 8,06,170 |
| | Grand Total | **2,79,54,701** |

Vaijnath Manmathappa Chille

Digitally signed by Vaijnath Manmathappa Chille
DN: CN = Vaijnath Manmathappa Chille, C = IN, S = Maharashtra, O = Government of Maharashtra, OU = Water Resources Department
Date: 2022.03.30 15:24:07 +05'30'

**( वैजनाथ चिल्ले )**
**शासनाचे उप सचिव**